**उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या आस्थापनेवर शिपाई (गट-ड) संवर्गातील काल्पनिक पदे निर्माण करुन ती बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. इएसटी १०१९/प्र.क्र. ४/प्रशा-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २८ नोव्हेंबर, २०१९

वाचा -

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : पदनि-२०१३/प्र.क्र.११२/१३/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०२.१२.२०१३
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : पदनि-२०१६/प्र.क्र.२९/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०२.०८.२०१६

प्रस्तावना:-

उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या आस्थापनेवरील शिपाई (गट-ड) संवर्गातील ११ रिक्त पदे, काल्पनिक पदनिर्मिती करुन, बाह्ययंत्रणेद्वारे भरण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

शासन निर्णय :-

अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग आणि सचिव (व्यय), वित्त विभाग यांच्या वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक ०९ जून २०१७ अन्वये गठीत उपसमितीने दिनांक ११ जून २०१९ रोजी झालेल्या बैठकीमध्ये उद्योग, ऊर्जा व कामगार विभागातील गट-ड संवर्गातील शिपायांची एकूण ११ काल्पनिक पदे निर्माण करुन ती बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यास मान्यता दिली आहे. सदर मान्यतेच्या अनुषंगाने उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या आस्थापनेवर शिपाई (गट-ड)संवर्गात ११ काल्पनिक पदे निर्माण करुन सदर पदे बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. यावर होणारा खर्च मागणी क्र. के-८,३४५१, सचिवालयीन- आर्थिक सेवा, ०९० सचिवालय, (००) (००)(०१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (अनिवार्य), १३, कार्यालयीन खर्च (३४५१००७३) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग, आकृतीबंध पुनर्रचना कक्ष कार्यासनाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १०२/१९ च्या अनुषंगाने पृष्ठांकन क्र. पदनि २०१९/प्र.क्र.४६/आपुक, दिनांक १२ जुलै २०१९ अन्वये प्राप्त झालेल्या उपसमितीच्या बैठकीच्या इतिवृत्तानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१२०४१४५८१०२७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra S Kaurte

Digitally signed by Rajendra S Kaurte
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industries Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed4c738df60ac2ac776b9e2481f77ad50aba9dc28bb31a482e03c7ee7b6f64d8, serialNumber=7caa550613a8c4cb7c593368faa24e20d6f8985f510118e6fc1af8b04a443ee8, cn=Rajendra S Kaurte
Date: 2019.12.04 15:01:52 +05'30'

**(रा.शा.कौरते)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
२) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
५) प्रधान सचिव (कामगार व प्रशासन), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) उप सचिव (आस्थापना) यांचे स्वी.स., उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कक्ष अधिकारी (आ.पु.क./व्यय-१६), वित्त विभाग, मुंबई.
८) कक्ष अधिकारी (नोंदणी शाखा/रोख शाखा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती.